वित्तीय वर्ष २०१६-१७
मुंबई इमारत दुरुस्ती व पुनर्रचना निधीत जमा करण्याकरिता महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरणाला उपकराची रक्कम वितरित करण्याबाबत......

महाराष्ट्र शासन
गृहनिर्माण विभाग
शासन निर्णय क्रमांकः अंशदान-२०१६/२२१/प्र.क्र.८१/दुवपु-२
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२,
दिनांक: २९ मार्च, २०१७

संदर्भ-१. वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि. २०.०४.२०१६
२. वित्त विभागाचा शासन निर्णय क्र. कॅशफ्लो-२०१५/प्र.क्र.१०५/अर्थ-१, दि. २१.०३.२०१७

**प्रस्तावना :**

मुंबई शहर बेटावरील जुन्या व मोडकळीस आलेल्या उपकरप्राप्त इमारतींची दुरुस्ती/ पुनर्बांधणी करण्याकरिता महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास अधिनियम, १९७६ च्या कलम ८२ अन्वये मुंबई शहर व बेटावरील इमारतींवर दुरुस्ती उपकर आकारला जातो. तसेच कलम ८५ अन्वये तो बृहन्मुंबई महानगर पालिकेकडून वसूल करण्यात येतो व एकूण वसुलीच्या ५ टक्के वटावाची रक्कम वगळून उर्वरित रक्कम राज्याच्या एकत्रित निधीत जमा करण्यात येते. दुरुस्ती उपकराची ही रक्कम विनियोजनान्वये, अर्थसंकल्पित करुन ती कलम ८६ नुसार मुंबई इमारत दुरुस्ती व पुनर्रचना निधीत वर्ग करण्यासाठी राज्य शासनाकडून हस्तांतरित करण्यात येते.

## शासन निर्णय :

मुंबई शहर बेटावरील उपकरप्राप्त इमारतींच्या दुरुस्ती व पुनर्रचना कार्यक्रमासाठी महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरणाच्या अधीनस्त मुंबई इमारत दुरुस्ती व पुनर्रचना निधीत वर्ग करण्याकरिता दुरुस्ती उपकराच्या रकमेपोटी देण्यासाठी सन २०१६-१७ च्या गृहनिर्माण विभागाच्या खर्चाच्या विवरणपत्रात मागणी क्र. क्यु-३, २२१६ गृहनिर्माण, ८०, सर्वसाधारण, ८००, इतर खर्च, (००) (०५) मुंबई इमारत दुरुस्ती व पुनर्रचना निधीत जमा करण्याकरिता महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्र विकास प्राधिकरणाला उपकराच्या वसुलीची रक्कम देणे (२२१६ ०६२५) ३२, अंशदाने या लेखाशीर्षाखाली रु. ४५,००,००,०००/- (रुपये पंचेचाळीस कोटी फक्त) इतकी सुधारित तरतूद अर्थसंकल्पित करण्यात आलेली आहे.

वित्त विभागाने दि. २१.०३.२०१७ च्या शासन निर्णयान्वये योजनेत्तर अर्थसंकल्पित तरतूदीच्या सुधारित वाटपानुसार स्तंभ-८ मध्ये नमूद (४५.०० कोटीच्या) मर्यादेत निधी वितरित करण्यास सहमती दर्शविली आहे. यापूर्वी या लेखाशीर्षाखाली चालू वर्षी रु.३९.२३ कोटी इतकी रक्कम वितरीत करण्यात आली आहे.

मुंबई इमारत दुरुस्ती व पुनर्रचना मंडळ यांनी मागणी यांनी मागणी केल्यानुसार बृहन्मुंबई महानगर पालिकेद्वारा राज्याच्या एकत्रित निधीत जमा केलेल्या रकमेच्या अनुषंगाने उपलब्ध अर्थसंकल्पित सुधारित तरतुदीपैकी दुरुस्ती उपकराची रक्कम रुपये ५,७६,३०,०००/- (पाच कोटी श्याहत्तर लक्ष तीस हजार फक्त) वित्त नियंत्रक, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण यांना वितरित करण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

वित्त नियंत्रक, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण यांनी महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास अधिनियम, १९७६ च्या कलम ८६ नुसार सदर रक्कम मुंबई इमारत दुरुस्ती व पुनर्रचना मंडळास उपलब्ध करुन द्यावी.

दुरुस्ती उपकराची रक्कम रुपये ५,७६,३०,०००/- (पाच कोटी श्याहत्तर लक्ष तीस हजार फक्त) महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरणास शासनाच्या गृहनिर्माण विभागाचे अवर सचिव तथा आहरण व संवितरण अधिकारी यांना प्रतिस्वाक्षरीत केलेले देयक, प्राधिकरणाने सादर केल्यानंतर वितरित करण्यात यावी.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या दि. २०.०४.२०१६ च्या परिपत्रकातील दिलेल्या सुचनांनुसार व प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे. प्रस्तुत प्रकरणी वित्त विभाग, शासन परिपत्रक दि. २०.०४.२०१६ मधील परिच्छेद क्र. ७ ते १८ मधील अटींची व परिशिष्टातील क्र. ९ मधील तपासणी सूचीतील अटींची पूर्तता होत आहे, असे प्रमाणित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३२९१७५७४८०३०९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Meenal Dilip Pednekar

Digitally signed by Meenal Dilip Pednekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=d3ff92ae3a8e5839988ca45db0eee3f448a9c88472103709dc1e857938d39c04, cn=Meenal Dilip Pednekar
Date: 2017.03.29 17:59:55 +05'30'

**(मीनल पेडणेकर)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. उपाध्यक्ष व मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१.
२. मुख्य अधिकारी, मुंबई इमारत दुरुस्ती व पुनर्रचना मंडळ, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१.
३. प्रधान महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा परिक्षा), मुंबई.
४. महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता), नागपूर.
५. वित्त नियंत्रक, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, महाराष्ट्र गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१
६. मुख्य लेखाधिकारी, मुंबई इमारत दुरुस्ती व पुनर्रचना मंडळ, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१.
७. संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, संगणक शाखा, मुंबई.
८. अधिदान व लेखाधिकारी, नवीन प्रशासकीय भवन, वांद्रे कुर्ला संकुलन, मुंबई-५१ (२ प्रती)
९. अवर सचिव (लेखा कार्यासन) गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१०. वित्त विभाग (व्यय-३ कार्यासन) (अर्थोपाय कार्यासन) (अर्थ-१७), मंत्रालय, मुंबई-३२.
११. अवर सचिव (अर्थसंकल्प-१/रोखशाखा) गृहनिर्माण, मंत्रालय, मुंबई-३२.
१२. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१.
१३. निवड नस्ती (दुवपु-२ कार्यासन) गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.